**अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वन निवासी (वनहक्कांची मान्यता) अधिनियम, २००६ व नियम, २००८ अंतर्गत स्थापन करण्यात आलेल्या जिल्हास्तरीय समितीवरील सदस्य सचिवांच्या नियुक्तीबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः वहका-२०१८/प्र.क्र.५१/का-१४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक:- ३० जून, २०१८.

**वाचा:-**

१) अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वन निवासी (वन हक्कांची मान्यता) अधिनियम २००६ व नियम २००८ आणि सुधारित नियम २०१२.
२) आदिवासी विकास विभाग, शासन पत्र क्र. मववि-२००७/प्र.क्र.५६/का.०९, दिनांक २१ जूलै, २००८
३) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक: वहका-२००८/प्र.क्र.१८४/कार्यासन-१४, दिनांक ५ जानेवारी, २०१०
४) अपर आयुक्त, आदिवासी विकास, अमरावती यांचे पत्र क्र. नियो/प्र.क्र.-/का-४(१)/३६९/२०१८, दिनांक २२ जानेवारी, २०१८
५) अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांचे पत्र क्र. वहका-१७-१८/प्र.क्र.(१)/का.३(४)/३४६२ दिनांक ८ मे, २०१८
६) आदिवासी विकास विभाग, शासन पत्र क्र. वहका-२०१८/प्र.क्र.५१/का-१४, दिनांक १० मे, २०१८
७) आदिवासी विकास विभाग, शासन परिपत्रक क्रमांक: वहका-२०१८/प्र.क्र.४३/का.१४, दिनांक ११ मे, २०१८
८) अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांचे पत्र क्र. वहका-२०१८/प्र.क्र.१/का.३(४)/३७४० दिनांक २१ मे, २०१८

**प्रस्तावना :-**

अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वन निवासी ( वनहक्कांची मान्यता) अधिनियम, २००६ व नियम, २००८ च्या नियम ३ नुसार गाव पातळीवर वनहक्क समिती, नियम ५ नुसार उपविभागीय स्तरावर उपविभागीयस्तरीय समिती, नियम ७ नुसार जिल्हास्तरावर जिल्हास्तरीय समिती व नियम ९ नुसार राज्यस्तरावर राज्यस्तरीय सनियंत्रण समिती स्थापन करण्यात आलेल्या आहेत. तदनुषंगाने संदर्भ क्र. ३ येथील शासन निर्णयान्वये अपर आयुक्तांच्या मुख्यालयाच्या जिल्हयाच्या ठिकाणी अपर आयुक्त, आदिवासी विकास यांची जिल्हा स्तरीय समितीचे "सदस्य सचिव" म्हणून नियुक्ती करण्यात आलेली आहे. मात्र, अपर आयुक्त, आदिवासी विकास यांचे कार्यक्षेत्र एकापेक्षा जास्त जिल्हयाचे असल्याने त्यांच्याकडील कार्यबाहुल्यामुळे तसेच ते विभागीय आयुक्त स्तरावरील समितीचे सदस्य सचिव असल्याने जिल्हास्तरीय वनहक्काच्या कामाला योग्य तो न्याय देता येत नाही, त्यामुळे अपर आयुक्तांच्या मुख्यालयाच्या ठिकाणी असलेल्या जिल्हास्तरीय समितीवर उप आयुक्त, आदिवासी विकास यांची "सदस्य सचिव" म्हणून नेमणूक करण्यास मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव संदर्भ क्र. ५ व ८ अन्वये शासनास सादर केलेला आहे. उक्त संदर्भ क्र. ४, ५ व ८ येथील प्रस्तावामध्ये नमूद केलेल्या वस्तुस्थिती विचारात घेता, अपर आयुक्त, आदिवासी विकास यांच्या मुख्यालयाच्या ठिकाणी असलेल्या जिल्हास्तरीय समितीवर उपआयुक्त, अपर आयुक्त, आदिवासी विकास यांची "सदस्य सचिव" म्हणून नेमणूक करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

प्रस्तावनेत नमूद केल्यानुसार, अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वन निवासी (वनहक्कांची मान्यता) अधिनियम, २००६ व नियम, २००८ अंतर्गत स्थापन करण्यात आलेल्या अपर आयुक्त, आदिवासी विकास यांच्या मुख्यालयाच्या ठिकाणी असलेल्या जिल्हास्तरीय समितीवर उपआयुक्त, अपर आयुक्त, आदिवासी विकास यांची " सदस्य सचिव" म्हणून नेमणूक करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वननिवासी (वन हक्कांची मान्यता) अधिनियम, २००६ व नियम, २००८ आणि सूधारित नियम, २०१२ मधील तरतूदींची काटेकोरपणे अंमलबजावणी करुन प्रलंबित वनहक्क दावे व अपिले यांचा निपटारा करण्यासाठी संदर्भ क्र. ७ नुसार विशेष "वनमित्र मोहिम" राबविण्यांत येत आहे. सदर मोहिम काळात जिल्हास्तरीय समितीचे कोणतेही काम प्रलंबित राहिल्यास संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास जबाबदार राहतील.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०७०२१२४०३४३३२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sunil Yuvagaunda Patil

Digitally signed by Sunil Yuvagaunda Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=242a9d4c980f22d1ebad86187039dae244ea2a9a89754cff19bc6510261eccdd, cn=Sunil Yuvagaunda Patil
Date: 2018.07.02 12:41:33 +05'30'

**( सुनील पाटील )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
२) अपर मुख्य सचिव (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
४) प्रधान सचिव (कृषी व पदुम), मंत्रालय, मुंबई
५) सचिव (वने), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
६) आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे
७) आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य,नाशिक
८) अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे, नाशिक, नागपूर,अमरावती
९) प्रधान मुख्य वन संरक्षक (वन बल प्रमुख) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
१०) सर्व जिल्हाधिकारी
११) मा.मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव
१२) मा. राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव
१३) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ, नाशिक
१४) व्यवस्थापकीय संचालक, शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळ, नाशिक
१५) सर्व मुख्य वन संरक्षक ( प्रादेशिक व वन्यजिव )
१६) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद सर्व
१७) सर्व उपविभागीय आधिकारी
१८) उपआयुक्त, अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे, नाशिक, नागपूर,अमरावती
१९) सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प,
२०) सर्व उप सचिव/अवर सचिव/कार्या.अधिकारी, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ३२.
२१) निवडनस्ती (का.१४) आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.